**संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय,**
**<u>मुंबई या पदावर पदोन्नती देण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक**
**शासन आदेश क्रमांक-पदोनि-१११४/प्र.क्र.६७/का.१४२७,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २७ फेब्रुवारी, २०१५

<u>वाचा</u> :- सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.ईएसबी-१११४/प्र.क्र.२४३/१३, दि.१२ फेब्रुवारी, २०१५

**<u>शासन आदेश</u> :-**

संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय सुधारित पे बँड ३७,४०० - ६७,००० + ग्रेड पे रु.८,९००/- या रिक्त पदावर, आस्थापना मंडळ क्र.१ च्या दि.०५/०२/२०१५ रोजीच्या शिफारशीनुसार श्रीमती अश्विनी दीपक देव, अपर संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांची पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येत आहे. सदर नियुक्ती ही खाली नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून तदर्थ तत्वावर करण्यात येत आहे :-

अ) श्रीमती अ.दी.देव, अपर संचालक यांच्याविरूद्ध विभागीय चौकशी प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही.

ब) वरील पदोन्नती मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने T.A.No.१/२०१४, T.A.No.२/२०१४ (रिट याचिका क्र.८४५२/२००४) संदर्भात दि.२८/११/२०१४ रोजी दिलेल्या निर्णयातील निर्देशांच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

क) सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेस अधीन राहून देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१५०२२७१११२०८९११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vasant Shankar Kulkarni

Digitally signed by Vasant Shankar Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Shankar Kulkarni
Date: 2015.02.27 12:33:51 +05'30'

**( वसंत कुळकर्णी )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री / मा.मंत्री (नियोजन) / मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव.
२) मा.मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने).
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
६) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.

त्यांना विनंती करण्यात येते की, श्रीमती अ.दी.देव, अपर संचालक यांच्या तदर्थ पदोन्नतीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेसाठीचा प्रस्ताव त्वरित सादर करावा.

१०) श्रीमती अ.दी.देव, अपर संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
११) सह संचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय,
कोकण विभाग / पुणे / नाशिक / नागपूर / औरंगाबाद / अमरावती.
१२) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय,
कोकण विभाग / पुणे / नाशिक / नागपूर / औरंगाबाद / अमरावती.
१३) सामान्य प्रशासन विभाग (का-१३), मंत्रालय, मुंबई.
१४) सर्व सहसचिव / उपसचिव /विशेष कार्य अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) लेखाधिकारी (लेखा शाखा), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई (२ प्रती).
१६) कार्यासन अधिकारी (का-१४१७/का-१४२६)
१७) निवड नस्ती (का-१४२७).